**श्री. नितीन प्रल्हाद उदमले, उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, अहमदनगर जिल्हा यांना केंद्र शासनाच्या धर्तीवर जुनी निवृत्तीवेतन योजना लागू करण्याबाबत.**




**महाराष्ट्र शासन**
**अन्न ,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन आदेश क्र. वैमाशा - २०२३/९१/ प्र.क्र.४४/ ग्रासं-३**
हुतात्मा राजगुरू चौक ,मादाम कामा रोड,
दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १५ जुलै, २०२४

**वाचा :-** १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकिर्ण - २०२३ / प्र.क्र.४६/ सेवा -४, दि. ०२.०२.२०२४
२) केंद्र शासनाच्या निवृत्तीवेतन व निवृत्तीवेतन धारकांचे कल्याण विभागाचे पत्र क्र. ५७/०५/२०२१-पी व पीडब्ल्यू (बी), दि. ०३.०३.२०२३.
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण - २०२४ / प्र.क्र. १८ / सेवा-४, दि.०२/०५/२०२४
४) अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, शासन निर्णय क्र. वैमाशा-२०२०/ प्र.क्र.६५/ ग्रासं-३, दिनांक १४ जानेवारी, २०२१
५) श्री. नितीन उदमले, उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, अहमदनगर जिल्हा यांचा दिनांक १४ फेब्रुवारी, २०२४ रोजीचा अर्ज...

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दिनांक २९ नोव्हेंबर, २००३ रोजी सहायक नियंत्रक, वैध मापन शास्त्र पदांची जाहिरात प्रसिध्द केली होती. जाहिरातीनुसार दिनांक २१ नोव्हेंबर, २००४ रोजी तांत्रिक परिक्षा पार पडून दिनांक १९ ऑक्टोंबर, २००५ रोजी परिक्षेचा निकाल प्रसिध्द झाला त्यानुसार दिनांक ८ डिसेंबर, २००५ रोजी उमेदवारांची मुलाखत पार पडून दिनांक २० जानेवारी, २००६ रोजी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून अंतिम निकाल प्रसिध्द करण्यात आला. श्री. नितीन उदमले यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत सहायक नियंत्रक, वैध मापन शास्त्र (गट-ब) या पदावर निवड झाल्याने ते दिनांक २९ मार्च, २००६ रोजी ते सहायक नियंत्रक (गट-ब) या पदावर रुजू झाले. श्री. नितीन उदमले, सहायक नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची जाहिरात दिनांक २९ नोव्हेंबर, २००३ रोजी म्हणजेच नवीन परिभाषिक अंशदान निवृत्तीवेतनाचा शासन निर्णय निर्गमित होण्याअगोदर म्हणजेच दिनांक ३१/१०/२००५ पूर्वी प्रकाशित झालेली आहे. त्यामुळे श्री. उदमले यांनी जुनी निवृत्तीवेतन योजनेचा लाभ मिळण्याबाबत शासनास विनंती केली आहे.

०२. केंद्र शासनाच्या अधिकारी / कर्मचारी यांची नियुक्ती (Appointed) ज्या पदावर किंवा रिक्त जागेवर करण्यात आली आहे व ज्यांची जाहिरात भरतीची / नियुक्तीची अधिसूचना नवीन

निवृत्तीवेतन योजना लागू करण्याच्या अधिसूचनेच्या दिनांकापूर्वी म्हणजेच दिनांक २२.१२.२००३ पूर्वी निर्गमित झाली आहे व जे दिनांक ०१.०१.२००४ रोजी किंवा त्यानंतर शासन सेवेत दाखल झाले आहेत व ज्यांना नवीन परिभाषित अशदान निवृत्तीवेतन योजना लागू झाली, त्या केंद्र शासनाच्या अधिकारी / कर्मचारी यांना केंद्रिय नागरी सेवा (निवृत्ती) नियम, १९७२/२०२१ लागू करण्याचा एक वेळ पर्याय (One Time Option) देणेबाबत, केंद्र शासनाच्या निवृत्तीवेतन व निवृत्तीवेतनधारकांचे कल्याण विभागाच्या दिनांक ३ मार्च, २०२३ च्या ज्ञापनान्वये निर्णय घेण्यात आला आहे.

०३. केंद्र शासनाच्या उपरोक्त निर्णयाच्या धर्तीवर, राज्य शासनाच्या सेवेत जे अधिकारी / कर्मचारी १ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर शासन सेवेत नियुक्त करण्यात आले आहेत. तथापि, त्यांची पदभरतीची जाहिरात / अधिसूचना दिनांक १ नोंव्हेंबर, २००५ पूर्वी निर्गमित झालेली आहे, अशा राज्य शासकीय अधिकारी / कर्मचारी यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ व महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी नियम, १९९८ व अनुषंगिक नियमांच्या तरतूदी लागू करण्यासाठी एक वेळ पर्याय (One Time Option) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण - २०२३/प्र.क्र. ४६/ सेवा-४, दि. २ फेब्रुवारी, २०२४ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आलेला आहे. या निर्णयानूसार अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अखत्यारितीतील वैध मापन शास्त्र यंत्रणे मधील सहायक नियंत्रक या संवर्गातील अधिका-याचे विनंती अर्ज / विकल्प शासनास प्राप्त झालेले आहेत. त्याअनुषंगाने महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ व महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी नियम, १९९८ व अनुषंगिक नियमांच्या तरतूदी लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन आदेश :-**

अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अखत्यारित असलेल्या वैध मापन शास्त्र यंत्रणेतील उप नियंत्रक या संवर्गातील अधिका-यांना वित्त विभागाच्या दिनांक ०२.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ व महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी नियम, १९९८ व अनुषंगिक नियमांच्या तरतूदी लागू करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | अधिका-याचे नाव व पदनाम | नियुक्ती आदेशाचा दिनांक | नियुक्तीचे पदनाम | परीक्षा जाहिरात क्रमांक व दिनांक | योजना लागू करण्याबाबतचा अर्ज दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. नितीन प्रल्हाद उदमले | २९.०३.२००६ | प्रबंधक | क्र २३१६/१४७६-एसडी/एक्स दिनाक २९ नोव्हेबर, २००३ | १४.०२.२०२४ |

१) दिनांक १४ जानेवारी, २०२१ च्या शासन निर्णयान्वये वैध मापन शास्त्र यंत्रणेतील पदांचे पदनाम बदलण्यात आले असून सहायक नियंत्रक गट-ब या पदाचे पदनाम उप नियंत्रक वैध मापन शास्त्र गट-ब असे बदलण्यात आले आहे.

२) श्री. उदमले यांनी जुनीनिवृत्ती वेतन योजना व अनुषंगिक नियम लागू करण्याचा पर्याय विहित मुदतीत सादर केलेला आहे.

३) संदर्भाधिनक क्र. १ अन्वये वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक ०२.०२.२०२४ नुसार, श्री. नि. प्र. उदमले यांना जुनी निवृत्तीवेतन योजना व अनुषंगिक नियम लागू करण्यात येत असल्यामुळे त्यांचे नव्याने भविष्यनिर्वाह निधी (GPF) खाते तात्काळ उघडण्यात यावे. तसेच त्याचे राष्ट्रीय निवृत्तीवेतन प्रणाली (NPS) मधील खाते बंद करुन, त्यातील त्यांच्या हिश्याची रक्कम देय / अनुज्ञेय व्याजासह संबंधित कर्मचा-याच्या नव्याने उघडण्यात आलेल्या भविष्यनिर्वाह निधी खात्यात जमा करावी.

४) संबंधित अधिका-यांच्या राष्ट्रीय निवृत्तीवेतन (NPS) खात्यातील राज्य शासनाच्या हिश्याची रक्कम देय / अनुज्ञेय व्याजासह राज्याच्या एकत्रित निधीत वळती करण्यात यावी.

५) नियंत्रक, वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी उक्त संदर्भ क्र. ३ येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकातील सूचनांचे तंतोतंत पालन करुन पुढील आवश्यक ती कार्यवाही तात्काळ करण्याबाबत संबंधितांना निर्देश द्यावेत. तसेच केलेल्या कार्यवाहीबाबत शासनास अवगत करावे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०७१९१६५८३९९१०६ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

POOJA PRASAD MANKAR

Digitally signed by POOJA PRASAD MANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=2587c101141ff0822d1f39f866ca3537dfc0e52728f898604a75ff77b46e7415, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3063036B7F64E995ED6A8BC7C9FBB1A5A10E6562F73D65107AD668D006B3B164, cn=POOJA PRASAD MANKAR
Date: 2024.07.19 17:10:12 +05'30'

**( पूजा मानकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) नियंत्रक, वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) महालेखापाल, महाराष्ट्र -२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) सह नियंत्रक, वैध मापन शास्त्र, नाशिक विभागीय कार्यालय, नाशिक
५) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक / अहमदनगर
६) श्री. नितीन प्रल्हाद उदमले, उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, अहमदनगर जिल्हा
(नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुख्यालय, मुंबई यांचेमार्फत)